महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना अनुज्ञेय रक्कम मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

**शासन निर्णय क्र.मगौपु-२०१४/६०२/(प्र.क्र.२१६/१४)/२८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: १८/०७/२०१४.

## वाचा

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२००८/प्र.क्र.४९/२८, दि.०७.०५.२०११.

२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६२११/प्रस्ताव/गौ.पु/सैकवि-१६/२४८४, दिनांक २४.०६.२०१४.

## प्रस्तावना

संदर्भाधीन अ. क्र. (१) येथील दिनांक ०७.०५.२०११ च्या शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत सैन्यातील १४ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना सुधारित दराने शासकीय अनुदान देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. आय सी-७१५२९ के, मेजर विश्वकर्मा सुधांशु जगन्नाथ यांना क्र.११-प्रेस/२०१३, दिनांक २६ जानेवारी, २०१३ रोजीच्या राष्ट्रपती सचिवालयाच्या अधिसूचनेन्वये " सेना पदक " प्रदान करण्यात आले असल्याने, या योजनेंतर्गत त्यांना एकरकमी अनुदान देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी वरील संदर्भाधीन अ.क्र.(२) येथील दिनांक २४.०६.२०१४ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

## शासन निर्णय

उपरोक्त नमूद शासन निर्णय व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली रु. ५,००,०००/- (रुपये पाच लक्ष फक्त) इतकी अनुदानाची रक्कम खालील लाभार्थ्यास देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | अनुदानाची देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | आय सी-७१५२९ के,<br>मेजर विश्वकर्मा सुधांशु जगन्नाथ,<br>विहांग को. ऑप.हो. सोसायटी, देवी चौक, शास्त्रीनगर, डोंबीवली (प), ठाणे. | सेना पदक | २६.०१.२०१३ | ५,००,०००/- |
| | | | एकूण | ५,००,०००/- |

२. या प्रयोजनार्थ होणारा रुपये ५,००,०००/- (रुपये पाच लक्ष फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० - इतर खर्च, (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११ ३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, ठाणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. वरील तक्त्यात नमूद केलेली संबंधित रक्कम लाभार्थ्याची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रिय अधिका-यांना द्याव्यात व तत्संबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२००८/प्र.क्र.४९/२८, दि.०७.०५.२०११ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७१८१६०११०५३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Pandurang Musale

Digitally signed by Sanjay Pandurang Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Pandurang Musale
Date: 2014.07.18 15:59:46 +05'30'

**सं.पां.मुसळे**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,

२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

३. मा.मुख्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,

४. मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,

५. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (शाखा ड-५/ड-६)(२ प्रती),

६. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

८. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा)महाराष्ट्र, मुंबई-३२,

९. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

१०. जिल्हाधिकारी, ठाणे,

११. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे,

१२. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००१ ( ५ प्रती),

१३. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, ठाणे,

१४. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई ३२,

१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,

१६. आय सी-७१५२९ के, मेजर विश्वकर्मा सुधांशु जगन्नाथ, विहांग को. ऑप.हो. सोसायटी, देवी चौक, शास्त्रीनगर, डोंबीवली (प), ठाणे.

१७. वित्त विभाग (व्यय ४), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१८. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन २५), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

१९. सामान्य प्रशासन विभाग (कार्या १९-अ), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

२०. निवड नस्ती (२ प्रती),